एकाच व्यापा-याबरोबर एका वित्तीय वर्षात केलेल्या व्यवहाराबाबत एकच "क" व "ड" बरोबर ई-१ व ई-२ नमुना देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांक-विकअ-२००१/ ३५ /कराधान-२.

वाचा:-शासन निर्णय क्रमांक-विकअ-१०९९/प्रक्र-५१-अ/कराधान-२,
दिनांक ४ जून १९९९.

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ४ मे २००१.

## शासन निर्णय

केंद्रीय विक्रीकर नियम १९५७ च्या नियम १२(१) मध्ये दिनांक ७.८.१९९८ रोजी करण्यात आलेल्या दुरुस्ती पूर्वी एका "क" व "ड" नमुन्यामध्ये एक लाखापेक्षा जास्त रकमेची उलाढाल असलेले व्यवहार अंतर्भूत करण्याची परवानगी नव्हती. दिनांक ७.८.१९९८ रोजी केंद्रीय विक्रीकर नियम १९५७ च्या नियम १२(१) मध्ये केलेल्या दुरुस्तीनुसार एकाच क अथवा ड नमुन्यामध्ये एकाच व्यापा-याबरोबर एक संपूर्ण वित्तीय वर्षात केलेल्या आंतरराज्य उलाढालीचा समावेश करण्याची तरतूद दिनांक १.४.१९९८ नंतर झालेल्या व्यवहारांकरिता लागू आहे.

२. दिनांक १.४.१९९८ पूर्वीच्या निर्धारणा कालावधीसाठी सदर तरतूद लागू नसल्यामुळे व्यापा-यांना त्या कालावधीसाठी झालेल्या आंतरराज्य व्यवहाराकरिता नमुना क व ड सादर करण्यामध्ये ब-याच अडचणी निर्माण होत आहेत असे शासनाच्या निदर्शनास आल्यामुळे सदर निर्धारणा कालावधीसाठीही करदात्यांनी केवळ एकच क अथवा ड नमुना सादर केला व त्यात संपूर्ण एका वर्षाच्या खरेदीचा उल्लेख त्या राज्यातील व्यापा-यांनी समाविष्ट केला असेल तर तो क अथवा ड नमुना ग्राहय समजला जाईल, असा शासन निर्णय, दिनांक ४ जून १९९९ रोजी काढण्यात आला.

३. उपरोक्त परिच्छेदामध्ये नमूद करण्यात आल्याप्रमाणे नमुना क अथवा ड बाबत जो निर्णय घेण्यात आलेला आहे तो नमुना इ-१ अथवा ई-२ या नमुन्यासाठी देखील लागू होणे आवश्यक आहे. नमुना ई-१ व ई-२ नमुन्यासंदर्भात देखील १.४.१९९८ पूर्वीच्या व्यवहारासाठी, एका वित्तीय वर्षाच्या कालावधीतील सर्व व्यवहारासाठी ग्राहय धरला जाईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(अ.प्रो. देशमुख)
शासनाचे उप सचिव.

कृ.मा.प.

प्रति:-

विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव,मुंबई-४०००१०, (४० प्रती)

प्रत:-

माहितीसाठी व आवश्यक त्या पुढील कार्यवाहीसाठी अग्रेषित.

१. महालेखापाल, (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
२. महालेखापाल, (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
३. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. निवासी लेखा परीक्षक, मुंबई
६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, संचालनालय, मुंबई
७. निवड नस्ती,कराधान-२.